**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा डोमा, ता.चिखलदरा, जि.अमरावती येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.२७/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ जानेवारी,२०१०.

**शासन निर्णय** : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, डोमा, ता.चिखलदरा, जि.अमरावती येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या रु.१३,६४,१०५/- एवढया रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून प्राचार्य, शासकीय माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा, चिखलदरा, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चिखलदरा तसेच कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर यांनी साक्षांकित केले आहे.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम दुरुस्तीचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या एकूण रु.१३,६४,१०५/- (रुपये तेरा लाख चौसष्ट हजार एकशे पाच फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर अंदाजपत्रकात ५% सेंटेज चार्जेसचा समावेश करण्यात आला आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

५. सदर बांधकामाचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००११८१४३३२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर.
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, चिखलदरा.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.